# लढा पावनखिंडीतला भाग २

बाजी प्रभू देशपांडेंच्या आत्मसमर्पणाचे काल्पनिक चित्र





**सिद्दी मसूदच्या हालचाली...**
**पावन खिंडीतील बाजीप्रभूंचे बलिदान...**
**विशाळगडावरील अकल्पनीय साहसी योजना...**
**कांगावखोर मराठा सरदार सुर्वे आणि दळवींची फजिती...**




सध्याच्या केळवडे धरणाला पाणीपुरवठा करणारी कासारी नदी आणि अन्य नाले, ओहोळ पावसाच्या सतत माऱ्यामुळे भरून वेगाने वहात असताना दीड ते दोन किमीच्या चिंचोळ्या वळसेदार नदीच्या पात्रात ही ‘खिंड’ तयार झाली आहे. प्रवाह घबधबे निर्माण करत वेडीवाकडी वळणे घेत जातो. प्रवाहाच्या दोन्ही बाजूला उंच पहाडीच्या कपाऱ्या आहेत.

# पूर्णाकृती पन्हाळा किल्ला दर्शन

पुसाटी बुरुज

अंबर खाना



वाघ दरवाजा, तबक उद्यान

सध्या अस्तित्वात नसलेला चार दरवाजा




तीन दरवाजा



MA Marathi (India)

# स्वप्नात रंगलो मी - सिद्दी जोहर

- मराठीत बोलणाऱ्या तोतया सिवाचा कडक आवेश पाहून गस्ती टरकले. त्या पथकाला सिद्दी जोहर यांच्या समोर उभे करणे गरजेचे वाटून त्यांना परत फिरायला लावले गेले असावे.
- हे पथक गडाच्या पायथ्यापासून २ - ३ किमी अंतरावर पकडले गेले असे मानले तर गडाच्या विरुद्ध दिशेच्या तीन दरवाजा भागातील खालच्या सपाट भागात मुख्य तळ ठोकून बसलेल्या सिद्दीच्या समोर यायला निदान १ तासापेक्षा जास्त वेळ लागला असेल.
- मधल्या काळात ज्या सरदारांच्या तुकडीतील ते मेटकरी होते त्यांना कळवले गेले. ते सरदार बातमीची शहानिशा करण्यासाठी सिद्दीच्या तंबूत हजर झाले असावेत.
- पावसाने संतत धार लावली असताना, उद्या सिवाने पांढरे निशाण धरून शरणागती पत्करली की पुढे काय करायचे? त्याला बरोबर घेऊन कर्नूल प्रांतातील आपल्या वर्चस्वाखाली राज्य करायला मनवायचे? का विजापूरच्या कमकुवत राज्यसत्तेची मान्यता मिळवून आपला मार्ग मोकळा करायचा?
- का सिवा सोबत वेगळा करार करून पुढील काळात दोन्ही बाजूंनी विजापूरकर आदिलशाहीचा खातमा करून ती गादी बळकावण्याची? का मोगलांचा नवा सेनापती शाहिस्तेखानाकडून शिवाजीला काबूत आणायला आपण मदत करावी?
- मुगलांना आपल्या सैन्याची गरज नसेल तर सिवाला आपल्याकडे वळवून शाहिस्ताखानाला औरंगाबाद व बऱ्हानपुराकडे ढकलायला जवळ करावे?

# सिद्दी जोहर याचा मुख्य तळ कुठे असावा? सर्व दरवाज्यांवर खडा पहारा



# ये तो असली सिवा नहीं है' !

- सर्व पर्यायांवर मनांत विचार आले असताना अचानक मेट्यावरून पकडलेल्या जथ्थ्याला समोर पाहताना 'हा शिवाजी तर नाही?' असे त्याला वाटत राहिले असावे. मृत अफझलखानाचा एकटा वाचलेला मुलगा फाजलखान तंबूत येताच, पाहता क्षणी 'ये सिवा क्या कर रहा रात में?' असे विचार करत असताना
- सर्व गोष्टी लक्षात येऊन सिवाने दगा देऊन आपल्याला फसवले आणि तो पळून जाताना अलगद हातात आल्याने सुखावलेल्या सिद्दीची झोप, 'ये तो असली सिवा नहीं है' या वाक्यानिशी खाडकन उतरली असावी.
- ‘गड उद्या खाली करून पकडले जाऊ नये म्हणून लपून कोकणात चाललो आहोत’. अशा वारंवार केलेल्या बतावणीतून समरूप सिवा काशीद आणि साथीदार कैदेत जीव गमावून बसले असावेत.
- या सर्व प्रकारात कमीतकमी आणखी एक तास वेळ गेला असावा. सिद्दीने आपल्या विश्वासातील म्हणून मसूद या जावई नातलगावर ताबडतोब त्याच्या घोडदळातील सैनिक पथकांना कोकणाच्या वाटेने खऱ्या शिवाजींच्या शोधात जायचा हुकुम केला खरा शिवाजी किती हजार सैन्य घेऊन गेला असावा याचा अंदाज घेतला असावा.

# पराभूत मानसिकतेचे अस्वस्थ सिद्दीचे सैन्य

- ज्या वाटेवर तोतया सिवा पकडला गेला तोच मार्ग धरून ते निघाले असे मानले तरी रात्रीच्या प्रवासात घोडे बुजणे, सुरवातीला जे घोडदळ गेले त्यांच्यामुळे ओली जमीन जास्त चिखलाची होऊन मागावून येणाऱ्या घोडदळाला अनेकदा उतरून घोड्यांना लगाम धरून नेणे प्राप्त झाले असेल.
- ऐनवेळी सोपा झेल सुटलेल्या किंवा जवळूही गोल करता न आल्याने खेळाडूंची पराभूत मानसिकता जशी बराच वेळ टिकून असते तशीच अवस्था सिद्दीच्या सैन्याची झाली असेल.
- चार महिने गडाला गराडा घालून बसल्याने एक प्रकारची शिथिलता आलेल्या सेनेची भर पावसात मध्यरात्री झालेली परवड बोचणी देत असेल. आपल्या मुख्य सरदाराला फसवून सिवाने जो विश्वासघात केला याचा राग व हताशा प्रत्येक शिपायाला सतावत असणार.
- अशा पराभूत मानसिकतेने निघालेल्या सैन्याला माहित नसलेला रस्ता, पावसाच्या सरींनी चिंब भिजलेल्या अवस्थेतून आपापल्या घोड्यांना सांभाळत पुढे सरकत जायचा वेग कमी असला तरी पायी चालणाऱ्या शिपायांपेक्षा जास्त असावा.

# सिवा पन्हाळगडावरच असायची शक्यता मोठी आहे !

- इतके मोठे सैन्य बाहेर जाते तरी आपल्या सैन्याला पत्ता लागू नये यासाठी सर्व मेटेकऱ्यांना समोर हजर करून कसून चौकशी केली गेली असता शिवा पन्हाळगडावर असायची शक्यता खूप मोठी आहे असे जाणवले असेल. जर तो गड सोडून फरार झाला असेल तर त्याला विशाळगडावर जायच्या शिवाय पर्याय नाही.
- तिथे आधीच सुर्वे आणि दळवीच्या सैन्याचे तळ ठोकून आहेत यामुळे सिवाला तिथे जाऊन देखील पकडता येणे शक्य आहे. असा विचार करून मसूदच्या मदतीला अन्य सरदारांनी आपापले घोडदळ मसूदच्या पाठोपाठ पाठवायला हुकूम दिला असावा.
- पायदळाशिवाय जंगलातील वाटांवरील लढाईत सरशी होणार नाही' हे ओळखून सिद्दी जोहरने पायदळाला ताबडतोब निघायचा आदेश दिला असावा.
- शिवाजी निसटून कमीत कमी २ तास उलटून गेले असल्याने सिद्दी मसूद सासऱ्याच्या आज्ञेने आपल्या हबशी जातीच्या सैनिकांचे घोडदळ व बाजी घोरपडे या मराठा सरदाराच्या या भागाची व भाषेची माहितगार असलेल्या सेनेला बरोबर घेऊन रात्री भर पावसात तातडीने निघाला.
- जसे जसे इतर सरदारांना बातमी लागली तसे त्यांचे घोडदळ घेऊन मसूदच्या मदतीला निघाले.

# रातोरात निघालेले हबशी सैनिक

## अंधारातील शोधाशोध

पकडला गेलेला सिवा कोणी भलताच होता हे समजल्यावर सिद्दी जोहरने आपल्या विश्वासू मसूद जावयाला त्याच्या घोडेस्वारांना सिवाला शोधायला जायला सांगितले. रात्रीची वेळ त्यात पावसाची रिपरिप. अशा अवस्थेत जेवढे नेता येतील तितक्यांना घेऊन मसूद निघाला

- ❖ शिवाजी महाराज निसटून कमीत कमी २ तास उलटून गेले असल्याने सिद्दी मसूद सासऱ्याच्या आज्ञेने आपल्या हबशी जातीच्या सैनिकांचे घोडदळ
- ❖ बाजी घोरपडे या मराठा सरदाराच्या या भागाची व भाषेची माहितगार असलेल्या सेनेला बरोबर घेऊन रात्री भर पावसात तातडीने निघाला.

# रात्रीच्या अंधारात माहित नाही अशा ठिकाणच्या शोधात

- पायदळाची एकूण १० हजारापेक्षा जास्त सेना वेगवेगळ्या पठाण आणि अन्य सरदारांत विभागलेल्या असल्याने ती निघायला पुढचे २ - ३ तास लागले असावेत. त्यांच्या तुकड्या कमी अधिक फरकाने संख्येने त्यांच्या बरोबर ठासणीच्या बंदुका, दारूगोळा, बत्ती लावायला आग लावायची सोय, भाले, तयार बाणांचे गठ्ठे व अन्य
- सामान घेऊन रात्रीच्या अंधारात माहित नाही अशा ठिकाणच्या शोधात घेऊन जाताना त्यांना ऐत्यावेळी मिळेल त्या वाटाड्यांच्या सोबतीने घेऊन जायला भाग पडले असावे.
- त्यांना पेच निर्माण झाला असावा की मलकापूरवरून जावे का मसाईपठारावरून पांढरे पाणी कडून अंबाघाटातील मार्गाने जावे? कुंद पावसाच्या वातावरणामुळे बऱ्याच डोंगरांच्या रांगा ढगात दिसेनाशा होतात.
- सहज ओळखता येतात असे डोंगरमाथे डोळ्यात भरत नसल्याने चाचपडत पुढे जावे लागणार होते... घोडे अंधाराच्या वाटेवरून जाताना नाठाळपणा करत असावेत.

# धावाधाव न करता मागाऊन येणाऱ्या कुमकीतून नव्या बातमीची वाट पहाणे शहाणपणाचे...

- देशाच्या अन्य भागातील सैनिकांना साचलेल्या पाण्यातून, चिखलातील वाटेतून सहनशक्तीचा अंत पाहणाऱ्या वळवळणाऱ्या प्राण्यांमुळे व जळवा, विंचूंच्या दंशाला ही सामोरे जाताना जीव गमवावे लागत असावेत.
- सतत चालून चालून वैतागलेले, भुखे-प्यासे सैनिक युद्धाच्या मानसिकतेत पुन्हा यायला वेळ लागतो. त्या काळरात्रीतून सकाळ झाल्यावर आठ वाजेपर्यंत ३५ ते ४० किमी अंतर कापल्याने सिद्दी मसूद बरोबर तातडीने आलेल्या १०० ते ३०० घोडदळ सैनिकांची प्रथम तुकडी मागावून येणाऱ्या सेनेच्या मदतीची वाट पाहात विश्रांती घेत असाव्यात.
- तोतयाने सांगितले तसे शिवाजी खरोखरच पळून गेला नसावा. कदाचित तो पन्हाळ्यात बसून असून आपल्या सैन्याच्या विस्कळीतपणाचा फायदा घेऊन कोल्हापुराच्या दिशेने जाऊ शकतो किंवा वाटाघाटींना मुकाट्याने बसतो.
- अशा अनेक शक्यतांमुळे उगाच धावाधाव न करता मागाऊन येणाऱ्या कुमकीतून नव्या बातमीची वाट पहाणे शहाणपणाचा मार्ग वाटून तो थांबला असावा.

# अंधारातील घोडदौड

- सिद्दी मसूदने बरोबर आणलेल्या वाटाड्यांच्या सोबत काही मराठ्यांची पथके बरोबर होती. * पहाट झाल्यावर वाटेवरच्या वस्त्यातील लोकांशी ते गावच्या भाषेत संपर्क करून ते मजल दर मजल करत पुढे येत राहिली. अशा लोकांना पैसे देऊन नंतर त्याच वाटेवरू येणाऱ्या सैन्याला आम्ही गजापूरच्या बाजूला गेल्याची बातमी व वाट सांगा म्हणून तयार केले गेले.
- पुर्वी गेल्यामुळे मलकापुरहून कोकणात उतरता येईल किंवा सिवा विशाळगडावर गेला असेल तर पांढरेपाणी यावरून गजापूरच्या पठारावर जाता येईल असे ठरवून मसूद पावसात भिजत घोडेस्वारांना सोबत घेऊन चालला होता.
- **मुगलांचे घोडदळ साधारण १० ते १२ किमी वेगाने पुढे सरकत असे मानतात. रात्र, पाऊस - चिखल, अनोळखी रस्ता यांचे विचार करता ४ ते ५ किमी वेगाने ५७ किमी अंतर काटायला ११ ते १२ तास लागतील असे मानले तर दुपारी १२ वाजेपर्यंत सिद्दी मसूदचे पहिले पथक पांढरेपाणीच्या आसपास आले.*

# विशाळगडावर सिवा पोचलाच तर तिथे त्याला पकडायला सिद्दीचा जावई मसूद  बरेच मोठे घोडदळ व पायदळ सैन्य एकत्र करून जाण्यासाठी वाट पहावी असे ठरवून होता. सिवाचे दळ किती मोठे असावे याचा अंदाज आल्याशिवाय एकदम सैन्याला लढाईत ढकलायला तो तयार नव्हता.



# सिद्दी मसूदच्या हालचाली व पावनखिंडीतील हातघाई...

## कांगावखोर जसवंतराव दळवी व शृंगारपूरचे सूर्यराव सूर्वेंची फजिती










## राजापुरच्या वखारीतील उचापतखोर हेनरी रेव्हिंग्टन

# महाराजांची धूर्त खेळी

- मलकापूरहून पुढे पांढरे पाणीपाशी डोंगराच्या खिंडीतून सरकताना त्यांच्या सरदारांना वाटेत जखमी पडलेले मावळे सापडले. त्यांची दमलेली व जखमी हालत पाहून ते जे सांगतायत त्यावर विसंबून राहावे असे वाटले. शिवाय ज्यांनी सिवाला इथवर आणले ते वाटाडे पकडल्यावर त्यांच्या तोंडून देखील सिवा कासारी नदीच्या पात्रात लपला आहे तर आणखी पुढे न जाता याच नदीच्या पात्रात उतरून शिवाजीला पकडून किंवा मारून नेता येईल असा आपापसात विचार करून घोडदळातील सैन्याला खाली पात्रात उतरवले. मागावून निघालेल्या पायदळाच्या तुकड्या २ ते ३ तासाच्या अंतराने तिथे पोहोचल्या. तोवर दुपारचे १२ वाजून गेले.
- रात्रभर चालून दमछाक झाल्यामुळे सिवा नदीत लपून बसला आहे असा तर्क निघेल अशी बतावणी करणारी परिस्थिती उभी केली. त्यानुसार सिद्दी मसूदने सैन्याला घाटदार वळणांतून पुढे खोल - खोल होत जाणाऱ्या कासारी नदीच्या चिंचोळ्या पात्रात उतरायची आज्ञा केली. पावसाची उघडीप झाली. सिवा आहे का? त्याचे किती सैनिक आहेत? कुठे लपला आहे याचा शोध घ्यायला माणसे उतरवली.

# शिवाजी महाराजांचे दिशाभूल तंत्र



# पात्रात उतरलेला कोणीही वर येईना! किती सैनिक असावेत? काय परिस्थिती आहे? हे सिद्दी मसूदला कळेना झाले?

- लढाईची वेळ आली आहे. आता आपली उपयुक्तता संपली आहे. जर आपण त्यात सापडलो तर जीवंत राहायची खात्री नाही असा असा रागरंग पाहून उरलेल्या वाटाड्यांनी, संधी साधून जंगलाच्या झाडीतून पसार व्हायला सुरवात केली असावी.
- साधारण १ किमी नंतर प्रवाह एकदम २० फूट खोल दरीत पडतो, त्यामुळे धबधबा बनला आहे. तो उतरून सिवाचे सैन्य आपली वाट पहात आहे असा सिद्दीने अंदाज बांधला. त्यांनी २ - ३ जणांची टोळी एकत्र करून दोर कमरेला बांधून खाली उतरवायला सुरवात केली.
- पाण्याच्या प्रवाहातून खाली येताना तोल सांभाळत असताना दगडांच्या अचुक वेधामुळे ते घायाळ होत राहिले. पण परत वर चढून मागे फिरणे शक्य नसल्याने मार खात मेले. सैनिक जास्त संखेने पात्रात उतरले. तेंव्हा मावळ्यांनी तलवारींनी हल्ला करून त्यांना मारून टाकले.
- बाजी प्रभूंच्या नेतृत्वाखालील सैनिक घळीत दोन्ही बाजूला झाडीत लपून बसले. सिद्दीचे सैनिक सतत पडणाऱ्या पावसात नदीच्या पाण्याच्या धारदार  प्रवाहात स्वतःला वाचवत शोधत जात असताना गोफणीच्या दगड धोंड्यांच्या माऱ्याने ते हैराण होऊन नामोहरम होत होते.
- अशा शिपायांना भाले-तलवारींनी जखमी करून मावळ्यांनी मारून टाकले. पात्रात उतरलेला कोणी एकही परत येऊन किती सैनिक असावेत? काय परिस्थिती आहे कळेना झाले?

# सिद्दी मसूदने आपले टेहळणी केंद्र हलवले.

- शिवाजी घळीत खरच लपला आहे कि नाही? याची खबर परत वर येऊन कोणी आणत नाही अशी दुर्दशा पाहून मसूद थांबला. नदीच्या पात्रात उतरले की परत येणे शक्य का नाही हे लक्षांत घेऊन आपली सैन्य रचना बदलायला सुरवात केली.
- पन्हाळ्याहून नंतर उशिरा निघालेल्या घोडदळाच्या पलटणी आता हळूहळून जमा व्हायला लागल्या. त्यातील ठासणी बंदुका चालवणारे, गन पावडर उचलणारे, बंदुकची सैनिक जेंव्हा येऊन मिळायला लागले. मग त्यांनी नदी पात्राच्या दरी न उतरता पहाडांच्या अगदी वरून जाऊन, पात्राच्या काठावरून घळीत लपलेल्या शिवसैनिकांना सावधपणे टिपून मारायला चालू केले.
- पण सर्दलेली गन पावडर, पावसात ओली होणारी ठासणीची बंदूक, लपायला भरपूर जागा यामुळे मारा प्रभावी होत नव्हता. मसूदने अनेक वेगवेगळ्या ठिकाणी वरून घळीत उतरवायाला सैनिकांना पाठवले.
- काहींनी मावळ्यांना मारून "अल्ला हो अकबर, दीन दीन" अशा आरोळ्या देऊन उत्साह वाढवला. पण कोणाला नक्की माहित नसावे की शिवाजी या नदीच्या पात्रात कुठे लपलेला आहे किंवा तो विशाळगडाला आधीच सटकला आहे.

# सिद्दी मसूदची बदलती नियंत्रण केंद्रे



# पावनखिंड दर्शन

बाजीप्रभूंच्या बांदल जवान पथकांकडून खाली उतरणाऱ्या सिद्दी मसूदचे सैनिक मारले जात राहिले

कासारीनदीचे चिंचोळे पात्रच पावनखिंड

बाजीप्रभूंची दांडपट्टा पथके

सिद्दी मसूदचे सैनिक वरून खिंडीत उतरायचे प्रयत्न करत राहिले

धोपेश्वर forest

कानटमळी धबधबा

Ya Ravji Tea

Pawankhind

पावनखिंड वाहनतळ आणि प्रवेशद्वार

Vishalgad Rd

# कारवाई ५ तास हळू हळू चालू राहिली

- सिवा या घळीत असेल तर आता तो पळून जाऊ शकत नाही आणि नसेल तर तो विशाळगडावर पोहोचू शकणार नाही, कारण मराठा सरदार सुर्वे व दळवी यांचे सैन्य तिथे तळ ठोकून आहे.
- ते त्याला गडापर्यंत पोहोचू देणार नाहीत. अशा दोन्ही शक्यता धरून या ठिकाणीच लक्ष केंद्रित केले गेले. म्हणून वेळ कितीही लागला तरी त्यांची पर्वा नाही असा पवित्रा घेतला गेला. काही सरदारांनी सुचवून पाहिले की आपल्यापैकी काही विशाळगडावर पाठवूया, पण सिद्दी मसूदने दुर्लक्ष केले.
- जशी सध्या देखील दहशतवादी हल्लेखोरांना पकडून मारायची सेनेची कारवाई बराच वेळ चालते. तशी साधारण सकाळच्या ११ ते २ मधे सुरू झालेली ही कारवाई दुपारनंतरही ५ नंतर पर्यंत हळू हळू चालत राहिली.

# घळीतील खोली किती बदलती आहे याचा अंदाज बाहेरून येत नाही



सौजन्य रिव्हरसाईड

# विशाळगडाचे दुरुन दर्शन

पन्हाळगडावर चार महिने तळ ठोकूनही अपयशी आणि चार तासात अवघड जागेतील गडावर प्रवेश मिळवणारा हे दोघेही लष्करी अधिकारी.
पण साहस, समयसूचकता, चातुर्य आदि नेत्रृत्व गुणातील तफावत विपरीत परिणाम घडवते...

# किल्लेदाराला बाहेरून दरवाजा उघडायला सांगायचे कसे?

- महाराज विशाळगडाकडे निघाले खरे परंतु तिथे काय परिस्थिती आहे याचा आढावा घेऊन रंगोजी मोरे या विशाळगडावरील गडकऱ्याशी संपर्ककरून त्याला विश्वासात घेऊन गडाचे दरवाजे उघडायसाठी खटपट करायला हवी होती.
- गडावर सहजासहजी जाण्याला आडकाठी करायला सिद्दीने कोकणातील त्यांच्या बाजूने लढणाऱ्या काही सरदारांच्या सैन्याच्या तुकड्या प्रभानवल्लीच्या रस्त्याने आणून तैनात केल्या असल्याची माहिती महाराजांना होती.
- पण सैन्यबल किती, कुठे तळ देऊन बसले आहे? त्यांना चकवून गडावर जायची शक्यता नसेल तर कुठे चकमक करायला भाग पाडायचे? वगैरे आडाखे त्यांनी मनात बांधले.

# रंगोजी मोरे विश्वासात घेऊन गडाचे दरवाजे उघडायसाठी खटपट करायला हवी होती...



# दुथडी भरून वहाणारी कासारी नदी ओलांडताना...



डोली म्हणून वापरलेल्या बुट्ट्यांना पालथे करून त्यांचा आधार घेऊन प्रवाहातून पार करायला सोईचे झाले असावे.






- गजापुरचे पठार पारकरून महाराजांच्या टेहळणी पथकाने पहाणी केली.
- गडासमोरील मोक्याच्या जागी तंबू पाहून सिद्दीकडून लढणाऱ्या मराठा सरदार सुर्वे आणि दळवीच्या तळ ठोकून बसले होते.
- ते सैन्य किमान दोनशे असावे असा कयास बांधला.
- महाराजांनी प्रसंगावधान राखून मार्ग काढला.

# महाराजांची वाकडी वाट!

- सुर्वे-दळवीच्या सैन्याला अंगावर घेऊन विशाळगडाच्या मुख्य दरवाज्यापाशी जायला फार वेळ घालवायला लागेल,
- त्यापेक्षा खाली उतरलेल्या ढगांचा आडोसा, गर्द झाडीतून, दरीत उतरून एकदम विशाळगडाच्या पायथ्यापाशी एकत्र येऊन हल्लाबोल केला तर?
- गडावरील टेहेळण्या करणाऱ्यांना पायथ्याखाली हातघाईची चाहूल लागेल.
- सुर्वेच्या सैन्याला आपण अचानक गडाच्या पायथ्यापाशी पाहून त्यांची धावपळ उडेल.
- हत्यारांची तयारीकरून दरीत उतरूनवर चढून यायला वेळ लागेल.
- अशा बेसावध गोंधळलेल्या सैन्याला वाटेत मारायला सोईचे जाईल.
- शिवाय कर्णे, शिंगानी पुकारा करून गडाचा दरवाजा पटकन उघडायला शक्यता निर्माण होईल.




❖ **गडकरी रंगोजी मोरेचे गडावरील चौक्यावरून गस्त घालणारे विशाळगडावरील तटबंदीवरून दिसणाऱ्या पावसातील विहंगम आसमंतात सगळे शांत आहे खबर देत होते.**

# अकल्पनीय साहसी योजना

- महाराजांनी आपल्या संरक्षक तुकडीला सोडून बाकी सैन्याला आदेश दिले. आता खोरनिंको नदीच्या खोऱ्यातील समोरची खाईत उतरायचे.
- गर्द हिरव्या झाडीतून सर्वांनी खाली उतरून नदी पार करायची.
- आपल्या कंपनीतील एका स्क्वाडने गडाच्या एका टोकावरच्या (सध्याच्या काळातील हनुमान मंदिराच्या बाजूच्या) दरवाजाला ठोठावून उघडायला प्रयत्न करायचा.
- उघडला तर ठीक नाहीतर झाडीतून लपत तटाच्या लगत राहून आमच्या येण्याची वाट पहायची.
- बाकीच्यांनी वेगवेगळ्या वाटांनी तटालगत चढत गडाच्या मुख्य दरवाज्यापाशीच्या भागात लपून राहायचे.
- नंतर आपण एकदम दरवाज्याकडे पळत सुटायचे. तेंव्हा सुर्वे-दळवीच्या सैन्याला वाटेत अडवून मारकाट करायची.

विशाळगडावरील तटबंदीकडून दिसणारे विहंगम दृष्य. महाराजांच्या सैनिक तुकड्या वर चढून येताना

खोर्निंको धरणपात्र

महाराजांच्या सैन्याने दरीत उतरायची जागा

Google

- विशाळगडासमोर सिद्दीच्या सैनिकांचा मोर्चा पाहून महाराजांचे सैनिक खोर्निनको घळीतून खाली उतरून विशाळगडावरील गडकऱ्याला दरवाजा उघडायला लावायचा प्रयत्न करत राहिले.
- पण पावसाची झोड आणि नेमके कोण मदत मागत आहे याचा संभ्रम वाटून गडकऱ्यांकडून कोणी काही कारवाई केली नाही.

विशाळगडाचा बालेकिल्ला

बसस्टँड

नवापुल

समोरच्या टेहळ्यांची शक्यतो नजर चुकवून मावळे इथे जमले

विशाळगडाची तटबंदी

- ❖ वारुळातून एकदम मुंग्या चवताळून बाहेर पडाव्यात असे महाराजांचे मावळे हर हर महादेव अशी रणगर्जना करत विशाळगडाच्या तटबंदीच्या बाजूने मुख्य दरवाज्याशी जायला भिडले.
- ❖ इतका वेळ बेसावध असलेले सरदार सुर्वे आणि सरदार दळवी पावसातील झडणाऱ्या पाण्याकडे पहात टिवल्या बावल्या करत होते.
- ❖ ते दरीच्या पलिकडून एकाएकी काय गळाठा आहे ते पाहायला धावले.







- सरदार सुर्वेला आपल्याला का इथे तैनात केले आहे याची पक्की जाणीव होती. त्याने सावध होत आपल्या सैनिकांना ओरडून म्हटले, ‘कदाचित शिवाजी सैनिकासह विशाळगडावर लपायला जायची शक्यता आहे.
- वर चढणाऱ्यांवर बाण फेकून टिपून मारा. मी आणि सरदार दळवी आमच्या खास दस्त्यासह खालून वर चढत जाऊन रस्ता आडवतो.
- कुठल्याही परिस्थिती वरच्या गडकऱ्याने त्यांच्यासाठी दरवाजा उघडता कामा नये’. (नव्या पुलाने जोडलेल्या दरीचे दृष्य)
- पूल नसताना सुर्वे-दळवीच्या सैनिकांना कसे दरीत उतरून पुन्हावर चढून यावे लागले.



दोन समोरासमोरच्या डोंगरमाथ्यामधील बिकट भौगौलिक रचना

- विशाळगडाची भौगोलिक रचना बिकट आहे. याची कल्पना यावरून यावी. दोन समोरासमोरच्या डोंगरमाथ्यामधील दरीतून वर चढून मुख्य तटाच्या प्रवेशद्वारापाशी जावे लागते.
- दुसऱ्या बाजूला मुचकुंदी नदीच्या पात्राने प्रभानवल्लीवरून कोकणात उतरता येते.

# सुर्वे नेमका समोर आला

- सुर्वे आपल्या सैनिकांसह पोचला तेंव्हा त्याची गाठ नेमकी महाराजांच्या खास पथकाच्या समोर पडली.
- "अरे हा तर शृंगारपुरचा सूर्याजी सुरवे! त्याच्या बरोबर तो दळवी ... मारा रे या हरामखोरांना"
- आपलीच माणसे आपल्याशी लढायला तलवारी घेऊन येतात तेंव्हा दया दाखवून उपयोग नसतो.

महाराजांचे ते भडकलेले रुप पाहून आपले मरण समोर उभे आहे हे ओळखून वेळीच सावध होत सुर्व्याने दळवीला इशारा केला. आणि ते दोघे परत पावली छावणीकडे परतले.

# ‘गडकऱ्यांना बोलवा. सगळ्या तोफांना तयार करा’.

- महाराज तातडीने मुख्य दरवाज्याच्या पायऱ्या चढत जात होते.
- हलकाऱ्यांच्या आरोळ्या व माजलेला गहजब वरून पाहून गडकरी रंगा मोरेंनी मुख्य दरवाज्याचे छोटे दार उघडून कोण आहे याची खात्री करायला आज्ञा केली.
- दरवाज्याबाहेर खुद्द महाराज आहेत असे कळल्यावर मुख्य दरवाजा पूर्ण उघडला गेला. महाराज आत आले. ‘गडकऱ्यांना बोलवा. सगळ्या तोफांना तयार करा. दारूच्या गोळ्यांचा बंदोबस्त करा.
- चूड पेटवून आग तयार ठेवा’. महाराजांच्या आज्ञा सुटल्या.

# गडकरी तातडीने कामाला लागले.

- ❖ पावसात भिजत असलेल्या तोफांना कोरड्या कापडाने पुसायला सुरवात झाली.
- ❖ दारूगोळे पडशातून आणून तोफेच्या मोठ्या तोंडाकडून भरून ठासून द्यायला लाकडी ठासण्या आणल्या गेल्या.
- ❖ पावसाची सर थांबली तशी तोफची वात तोफेच्या भोकात घालून दारु भरायला ठासणीने ठोके द्यायला तोफची कामाला लागले.
- ❖ आधीच भिजलेल्या तोफा, सरदलेले दारूचे गोळे, इरल्याच्या आडोशात बत्ती द्यायला पावसाचे शिंतोडे न पडायची दक्षता घेऊन देखील बत्तीची वात आग पकडत नव्हती.
- ❖ महाराज बेचैन होत ती तयारी पहात होते.

# तोफची कानात बोळे घालून पळून जाऊन लांब जाऊन उभे राहिले.

- तोफांचे बार व्हायला लागणारी दिरंगाई पाहून महाराजांनी आज्ञा केली, ‘शेण्या पेटवा. गडाच्या टोकाकडे जाऊन तिथे पांढरा धूर करत रहा. निदान इशारा मिळत राहील’.... रंगा मोरेने ताबडतोब शेण्या, तेलाचे बोळे व चकमकीचे दगड देऊन पिटाळले.
- गडावरच्या तोफांच्या वातींनी आग पकडलेली पाहून तोफची व आसपासचे मावळे पळून जाऊन कानात बोळे घालून पार लांब जाऊन उभे राहिले.

# पावनखिंडीतील परिस्थिती

- ❖ आता केंव्हा ही धडाका होईल. पण काही ना काही कारणाने तोफा धडाडेनात.
- ❖ तेवढ्यात एका तोफेतून धडा...म असा प्रचंड आवाज करत विशाळगडाचा आसमंत दणाणला.
- ❖ तोफ थंड होई पर्यंत दुसरीच्या वातीने पेट घेतला तिचा आवाज आधीच्या आवाजानंतर जास्त वेळ आसमंतात दुमदुमत राहिला.
- ❖ पुर्ण गजापुरचे खोरे प्रतिध्वनींच्या आवाजाच्या दणक्याने दचकून सैरभैर झाले.
- ❖ तोफा अधून मधून वाजतच राहिल्या. तिकडे आसुसलेल्या कानांवर त्या धमाकेदार गर्जना आदळल्या.



# बाजी प्रभू देशपांडे यांच्या आत्मसमर्पणाचे काल्पनिक चित्र



# बाजींच्या लढण्याचा उद्देश सफल झाला होता

- ❖पावनखिडीत उरलेसुरले बाजींचे सैनिक शस्त्रे टाकून खिंडीच्या बाहेर सिद्दीच्या समोर आले.
- ❖घायाळ बाजी प्रभूंच्या शरीराचे रक्षण करताना मावळे दिसत होते. सिवा तिथे नव्हता.
- ❖तोफांचे आवाज विशाळगडावरून आलेले सिद्दी मसूदने पण ऐकले होते.
- ❖याचा अर्थ त्याला समजून गेला की सुर्वे- दळवींना लोळवून सिवा गडावर पोचला...
- ❖आपल्या घोडदळाला आज्ञा देत तो स्वतः विशाळगडाकडे कूच करून पोहोचला.

# सिद्दी मसूदला विशाळगडाकडे जायची उशीरा सुचलेली तातडी




आपले निवडक घोडदळ घेऊन सिद्दीने पावसात चिखलाच्या रस्त्यावरून पावनखिंडीपासून विशाळगडाकडे कूच केले.

# सिद्दी मसूद खालच्या मानेने पन्हाळगडाकडे परतला.

- ❖ विशाळगडाच्या पायथ्याशी खाली मान घातलेले सुर्वे आणि दळवी दोन्ही सरदार म्हणाले, 'आम्हा काही माहित नाही की सिवा पन्हाळ्याहून पळाला ते'.
- ❖ 'इथे अचानक २-३ शे मावळे समोरच्या दरीतून चढून वर आले आणि एकदम तटाच्या दरवाज्याला भिडले. आम्ही दोघांनी पाठलाग करून मारायची शर्थ केली.
- ❖ माझी आणि सिवाची समोरासमोर तलवारीने खटाखटी झाली'.
- ❖ पण मी घाबरून तिथून पळालो हे वगळून तो पुढे म्हणाला, 'मी सिवाला वर चढून जाताना पाहिले. मघाशी त्यांनी तोफेचे बार काढून आम्हाला घाबरवायचा प्रयत्न केला'.
- ❖ 'मुर्खांनो, तो तुम्हाला घाबरवायला नव्हे त्या कासारी खिंडीत लपलेल्या त्याच्या सैन्याला आम्ही गडावर पोचल्याची ती खूण होती' सिद्दीचे डोके भडकले होते.
- ❖ 'पण तुमच्या तावडीतून तो सुटला कसा'? सुर्व्याने चकीत होऊन विचारले.
- ❖ 'ते असू दे'... आपल्या बरोबरच्या सैन्याला विशाळगडाला गराडा घालायला आदेश देऊन तो खालच्या मानेने पन्हाळगडाकडे परतला...

# या नंतर काय घडले

- महाराज इंग्रजांची दगाबाजी आणि सुर्वे-दळवींच्या हरामखोरीची आठवण ठेऊन होते.
- पुढच्या काही महिन्यात राजापूरची इंग्रजांची वखार जाळून राख झाली.
- हेनरी रेव्हिंग्टनचा आगाऊपणा इंग्रजांना भोवला.
- सुर्वे - दळवींची पळापळ होऊन परागंदा व्हायला लागले...
- अशी ही पावनखिंडीच्या लढ्याची सांगता...
- वाटाड्यांच्या मदतीची आणि फसगतीची...

# प्रत्यक्ष पाहणी व निष्कर्ष

- सध्या जातात तो मार्ग विशाळगडावर जायला उपयुक्त आहे? या पेक्षा जवळचा अन्य मार्ग शोधला जावा. हे काम गूगल नकाशातून समजून घ्यायला सोपे जाते. पण प्रत्यक्षात पाहून ठरवणे महत्त्वाचे.
- या कामासाठी दुर्ग प्रेमींचा सहभाग, ड्रोन शूटिंग, ३ डी कॅमेरा, याच्या उपयोगातून शोध घेतला जावा. पुढील ३ ते ५ वर्षांत याचे परिणाम दिसले तरी खूप झाले... असो.
- एका टॅक्सीमधून आधी कनेरी मठाधिपती अदृश्य स्वामींना भेटून तेथे १५ वर्षाखालील मुलांनी दुटांगी धोतराचा काचा मारून उंच निंच घोड्यावर बसून भरधाव रपेट करून आपल्या साहसाची व पटाईत घोडेस्वारीची प्रात्यक्षिके सादर केली. अशा प्रकारे अन्य ६४ विद्यांचे प्रशिक्षण चालू असल्याचे समजून घेतले. मुलांच्या बरोबरीने मुलींना विविध प्रशिक्षण घेताना पाहून आनंद झाला. असो.

# पन्हाळ्याच्या वाटेवर





- इंजोळे गावाचा फाटा पकडून जाताना एका दुकानदाराने मलाही सामील करा म्हणून आपला व एका फोटो ग्राफरचा मो क्र दिला.
- डांबरी रस्ता नागमोडी वळणे घेत संजीवनी शिक्षण संस्था पारकरून पुढे निघाला.
- आता पन्हाळ्याचा टीव्ही टॉवर वगैरे दिसू लागले.

# ते गाव होते इंजोळे

- त्या ठिकाणी चालकाला खाली उतरवून बाईकवर जमलेल्या तरुणांच्या घोळक्याला मला भेटायला बोलवले.
- ते गाव होते इंजोळे. मी खाली उतरून बोलायला सुरुवात केली तोवर आणखी बरेच लोक जमले. साखरपुड्याच्या निमित्ताने पाहुण्यांना भेटायला आलेल्यांशी मी सुरू केलेल्या प्रकल्पाची माहिती दिली या भागातून महाराज गजापूरला गेले होते? हे माझे म्हणणे त्यांना पटकन मान्य झाले.
- कारण आजकाल त्या मार्गाने जायची सोय आहे. शिवाय मसाईपठारावरून जायची गरज नाही. घुंगरू मांजरेला गेले की कासारी नदीच्या बाजूला गजापूर येते असे आपल्याला अनुभवातून सांगू लागले.



# घुंगरू - सोनुर्ले - बुरंबळ

- घुंगूर गाव आले पाणी पिऊन काही तरूण-तरूणींना एकत्र बोलावले.
- पुढच्या रस्त्याची अवस्था कार जाऊ शकणार नाही अशी आहे.
- पण तुम्ही म्हणता तसे सोनुर्ले कडून बुरांबळवरून पांढरे पाणी पर्यंत आम्ही पायी चालत जाऊ.
- वाटेत फोटो काढून किती वेळ लागतो, कोणत्या वस्त्या, खेडी लागतात याची माहिती व्हॉट्स ॲप वरून वरचे वर देऊ पण हे काम लगेच होणार नाही.
- सवडीने करू म्हणून मान्य केले.





पुढील प्रवासात मसाईपठार मागे पडले.|









- परतताना कार चालकाच्या माहितीच्या आधारे संजीवनी संस्थेच्या परिसराला लागूनच्या डांबरी रस्ता पकडून  सरळ वर तीन दरवाजा च्या प्रांगणात प्रवेश करून थांबलो.
- पुढे कार साठी रस्ता बंद होता म्हणून परत खाली उतरून वळसा घालून गडावर बाजींच्या पुतळ्याचे दर्शन घेऊन काली चरण महाराजांच्या समावेत भोजन करताना तेथे जमलेल्या तरुणांनी आम्ही या मार्गाचा धांडोळा घेतो.
- गडावरील काही जागा मी गाईडना दाखवल्या. सध्या मान्यता आहे त्या शिवाय महाराज कोण कोणत्या मार्गाने खाली उतरून जाऊ शकतात याचा प्रत्यक्ष जाऊन अनुभव मोबाइलवर फोटो सादर करून कळवतो असे म्हटले.

# उचापतखोर हेनरी रेव्हिंग्टन









**इतिहास तज्ज्ञ श्री. गजानन भास्कर मेहेंदळे यांच्या 'श्री राजाशिवछत्रपती भाग १ व २ आणि इंग्रजीतील ग्रंथ Shivaji His life and Times' या तीन संदर्भातून साकार एक उपद्रवी व्यक्तिमत्व...**

# हेनरी रेव्हिंग्टनचे उपद्व्याप

- पन्हाळ्यावरून महाराजांच्या सुटकेचा व पावनखिंडीतील लढ्याचा भाग "मिलिटरी कमांडरांच्या नजरेतून - वाटाडे" या लेखमालेतून सादर केला होता. त्यावेळी इंग्रजांनी तोफातून गोळे दागायाला सुरवात केल्यावर महाराजांना गडावरून लवकर सुटका करायला आखणी करावी लागली असावी, असे म्हटले गेले होते.
- शिवाय इंग्रजांनी आधी केलेला करार मोडून सिद्दी जोहरच्या बाजूने लढायला उतरावे हे त्यांना संतापजनक वाटले होते. या प्रकारात हेनरी रेव्हिंग्टन याचे उपद्व्याप कसे कारणीभूत होते. असे इंग्रजी वृत्तांतातून समजून येते. महाराजांनी त्यांना कशी अद्दल घडवली तेही समजून घ्यायला रंजक आहे म्हणून सादर..

# होता टॅली क्लार्क पण रुबाब बॉसचा!

- ईस्ट इंडिया कंपनीतील फॅक्टरीत (सध्या फॅक्टरी म्हटले की यंत्रांच्या धडाकेबाज आवाजात विविध वस्तू, माल बनून विक्रीसाठी पाठवून द्यायची इमारत असे डोळ्यासमोर येते. इथे फॅक्टरी किंवा वखार नावाचा बोध करून घ्यायचा असेल तर जहाजावरून आलेला माल उतरवून व जाणारा माल भरायच्या तयारीत ठेवण्याची गोडाऊनची जागा किंवा इमारत असे सध्या मालवाहतूक करणाऱ्या ट्रक कंपनीच्या गोडाऊनची जागा जशी दिसेल असे त्याचे रुप असावे. नंतरच्या कालात वरिष्ठांची निवासस्थाने, चारीबाजूंनी कोट बंदोबस्त वगैरे सोई त्यात कालांतराने होत गेल्या असाव्यात.)
- टली क्लार्कच्या नोकरीकरिता हेनरी रेव्हिंग्टन इ. स. १६५१ मध्ये इंग्लंडहून सुरतला आला. तेव्हापासून इ. स. १६५८ पर्यंत त्याचा वार्षिक पगार वीस पौंड (म्हणजे सुमारे १८० रुपये) होता. इ. स. १६५६ मध्ये तो कंपनीच्या सुरत येथील वखारीत हिशोबनीस म्हणून काम करीत होता.
- कंपनीचा सुरत येथील एजंट (मुख्य व्यवस्थापक) जॉन स्पिलर हा २८ जानेवारी १६५७ रोजी सुरतहून इंग्लंडला रवाना झाला. त्याच्या जागी एजंट म्हणून ज्याची नेमणूक केल्याचे कंपनीने कळविले होते तो कंपनीचे ते पत्र सुरतला पोचण्यापूर्वीच मृत्यू पावला होता.
- त्यामुळे कंपनीकडून पुढील हुकूम येईपर्यंत रेव्हिंग्टन कंपनीचा सुरत येथील हंगामी एजंट झाला आणि मॅथ्यू ॲण्ड्यूज व जॉन लॅम्ब्टन हे त्याचे सहाय्यक म्हणून काम करू लागले.

# इंग्रजांनी काही लहान तोफा पुरून ठेवल्या होत्या...

- १६५७मध्ये शाहजहान आजारी पडला, तो मरण पावला अशा अफवा भारतात सर्वत्र पसरल्या आणि त्याचे मुलगे यादवी युद्धाच्या तयारीस लागले.
- शाहजहानचा सर्वात धाकटा मुलगा मुरादबक्ष हा तेव्हा गुजरातचा सुभेदार होता. यादवी युद्धाच्या तयारीकरिता पैसा उभा करण्यासाठी त्याने शाहबाज नावाच्या मनसबदाराच्या हाताखाली पाच हजार स्वार देऊन त्याला सुरतच्या किल्ल्यातील बादशाही खजिना काबीज करण्यास पाठविले.
- शाहबाज याने नोव्हेंबर १६५७ मध्ये सुरत शहर ताब्यात घेतले पण सुरतच्या किल्ल्यातील शिबंदी त्याला प्रतिकार करू लागली. तो काबीज करण्याकरिता त्याने इंग्रजांची व डचांची मदत मागितली. पण ती देण्याचे त्यांनी नाकारले.
- तेव्हा इंग्रजांनी त्याला तोफा द्याव्यात अशी मागणी त्याने केली. त्यावर आमच्याकडे मोठ्या तोफा नाहीत असे उत्तर इंग्रजांनी दिले. इंग्रजांनी काही लहान तोफा पुरून ठेवल्या होत्या त्या मात्र त्याने खणून काढून ताब्यात घेतल्या.
- या वेळी रेव्हिंग्टन कंपनीचा सुरत येथील एजंट म्हणून काम पहात होता. त्याने तो स्वत: आणि त्याचे काही सहकारी यांच्या मालकीच्या काही लोखंडी तोफा सुरतचा मुख्य अधिकारी मिर्झा अमीन याला विकत दिल्या.

# इंग्रज कंपनीला हेनरीच्या उचापतीमुळे फुकटचा बुर्दंड पडला

- तेव्हा कंपनीच्या प्रेसिडेंटला बंदरावर जाऊ न देणे, कंपनीचा माल जकात नाक्यावर अडकवून ठेवणे, इत्यादी प्रकारे त्याने कंपनीच्या व्यवहारात अडथळे आणण्यास सुरुवात केली.
- त्याच्यानंतर डिसेंबर १६६० मध्ये त्या पदावर आलेल्या मुस्तफाखानानेही तेच धोरण पुढे चालू ठेवले. शेवटी हे प्रकरण निर्णयाकरिता औरंगजेबाला कळवावे अशी तडजोड झाली.
- दर मणास २१.५ रीअल्स ऑफ एट हा मुळात ठरलेला तोफांच्या किमतीचा दर कमी करून १६ रीअल्स ऑफ एट करावा आणि इंग्रज जर ते मान्य करण्यास तयार नसतील तर त्यांनी तोफा परत घ्याव्यात व
- तोफांच्या किमतीपोटी त्यांना पूर्वी जकातीतून वळती करून दिलेली रक्कम त्यांनी परत करावी असा निर्णय औरंगजेबाने दिला. (काही कारण नसताना इंग्रज कंपनीला हेनरीच्या उचापतीमुळे फुकटचा बुर्दंड पडला.)

# राजापूरला त्यांच्या वखारीत जाऊन महाराजांनी बंदी केले

- शिवाजी महाराज पन्हाळगडावरून सुटून (१३ जुलै १६६०)
- विशाळगडावरून राजगडावर परत आल्यानंतर करतलबखानाच्या सैन्याला २ फेब्रुवारी १६६१ ला उंबर खिंडीत गाठून शरणागती पत्करायला लावल्यानंतर, महाराजांनी विशाळगडाच्या पायथ्याशी अदिलशहाच्या बाजूने लढणाऱ्या सूर्याजी सुर्वे व जसवंत दळवी यांच्या बेमुर्वतखोरीला धडा शिकवून दिला.
- मग ज्या इंग्रजांनी कंपनीच्या तर्फे झालेला करार मोडून रुस्तुम-ए-झमानला गुपचुप भेटून दगाबाजी केली त्यांना धडा शिकवायला मार्च १६६१ मध्ये, राजापूर येथे त्यांच्या (फॅक्टरी) वखारीत जाऊन तिथे असलेल्या आठ इंग्रजांना कैद केले. ते होते:१. हेनरी रेव्हिंग्टन २. रँडलोफ टेलर ३. रॉबर्ट फेरोंडो ४. रिचर्ड नेपियर ५. रिचर्ड टेलर ६. फिलिप गिफार्ड? ७. एक सर्जन, कदाचित तो रॉबर्ट वॉर्ड असावा (हा डॉक्टर कंपनीचा होता. त्यालाही हेनरीने पन्हाळ्यावर अळेबळे तोफा उडवायच्या मोहिमेवर नेले होते)* ८. विलियम मिन्घेम. पैकी पहिले सात ईस्ट इंडिया कंपनीचे नोकर होते.

# अफजलखानाच्या मालकीच्या तीन जहाजे होती...

- १६५९ साली लंडन नावाच्या जहाजाला सुरतहून ते राजापूरपर्यंत पाठवले गेले. त्यात मिंघेम जहाजाच्या तोफखान्याच्या गोलंदाजांचा तो मदतनीस **(gunner's mate)** होता.
- राजापूर वखारीत हेनरीने त्याला वार्षिक £ 30 वार्षिक बोलीने रोजगार दिला. अफजलखानाच्या मालकीच्या तीन जहाजांपैकी एका जहाजाला हेनरी रेव्हिंग्टनने आपल्या थकबाकीची सुरक्षा म्हणून ताबा घेतला आणि त्याचे नाव राजापूर मर्चंट ठेवले.
- मिन्घेमला त्या खानाच्या जहाजाचा कमांडर म्हणून नियुक्त करण्यात आले. मिंघेम हा त्यानंतर तो रेव्हिंग्टन बरोबर पन्हाळाकडे तोफा घेऊन त्या उडवायला रवाना झाला.

# उचापतखोरीची ‘ब्याद’ म्हणून किर्ती असल्याने तो राजापुरातील फॅक्टरीत पाठवला गेला.

- या तोफा होत्या किती? त्यांचा महाराजांच्या एकंदरीत निसटायच्या मोहिमेवर काय प्रभाव पडला? यावर विचार व्हायला हवा.
- हेनरी राजापुरच्या फॅक्टरीत सुरते प्रमाणे टॅली क्लार्क - हिशोबनीस होता.(Tally clerk count goods and match them with shipping invoices and packing orders to ensure the accuracy of incoming and outgoing shipments. They record weights, measurements and dimensions of cargo. Tally clerk calculates storage, damage, shipping and receiving fees.)
- पण मध्यंतरी सुरतेत नव्या एजंटची नेमणूक होऊन तो रुजू होईपर्यंत कंपनीच्या सभासद मंडळाने ठरवले असल्याने हाच हंगामी एजंट म्हणन काम करत असे. राजापुरला नवी फॅक्टरीची शाखा सुरू झाल्यावर याला वरिष्ठतेमुळे किंवा उचापतखोरीची ‘ब्याद’ म्हणून किर्ती असल्याने तो राजापुरातील फॅक्टरीत पाठवला गेला. तिथे हाताखालच्या लोकांच्या समोर मालकाच्या रुबाबात तो वागत असावा.

# २ उखळी तोफा आणि ५० दारूगोळे

- त्याकाळात जहाजांना स्वरक्षणासाठी तोफा - गोळे, ते उडवू शकणारे शिक्षित सैनिक, हत्यारे लागत पण इंग्रजी कंपनीने अशी हत्यारे विक्रीला बंदी केली होती. नंतर कालांतराने ती उठवली गेली.
- मालाच्या वाहतुकीतील सलोख्याचे संबंध राखून वेतनाव्यतिरिक्त पैसा कमवण्यासाठी व वेळ प्रसंगी आपल्या रक्षणासाठी काही हत्यारे व दारूगोळ्यांचे साठे तो व त्याचे साथिदारांनी साठवून गोडाऊनच्या कोपऱ्यात दडवून वा पुरुन ठेवले असावेत.
- असे करत त्याने कंपनीला पत्ता न लागू देता येणाऱ्या - जाणाऱ्या जहाजावरील लोकांशी संगममत करून २ उखळी तोफा होत्या आणि ५० दारूगोळे असे सामान घेऊन ठेऊन ते विकायच्या संधीची तो वाट पहात असावा.
- त्याचे व रुस्तुम-ए-झमानचे पुर्वीपासून बोलाचालीचे संबंध होते. हेनरीने पुर्वी एकदा रायबागला परस्पर भेटून चांदीच्या नाण्याची टांगसाळ राजापुरात उघडायची कल्पना मांडली होती.
- रुस्तुम ए झमान सिद्दी जोहरच्या सैन्यातील प्रमुख सरदार होता. त्याच्या सांगण्यावरून हेनरीकडील तोफांच्या मदतीने पन्हाळगडावर भगदाड पाडायची शक्कल पुढे आली असावी.

# अणुस्कुरामार्गाने कोकणातून आला असावा.

- मग हेनरी आपल्या बरोबर इतर मदतनिसांना घेऊन मिंघेमला तोफची बनवून तोफांना गाड्यावर घालून अणुस्कुरामार्गाने कोकणातून आला असावा.
- (अंदाजे १०० किमीच्या आसपास अंतराच्या) वाटेत त्याने रायपाटण व अणुस्कुर्याहून राजापुरच्या आपल्या कार्यालयाला फुशारक्या मारणारी पत्रे लिहिली.
- ‘विजापुरच्या सरदाराची ह्या लढतीत (आपल्या तोफांमुळे?)सरशी होत आहे’. त्या पत्राच्या उत्तरात, राजपुरचे त्याचे साथिदार म्हणतात कि तुमच्या पत्रातील मजकूर वाचून आनंद झाला.
- आशा आहे की पुढील पत्रात प्रत्यक्ष कसे घडले ते वाचायला मिळेल.

# हेनरी तोफा घेऊन अणुस्कुरामार्गाने राजापुरहून असा आला असावा.




हेनरीला शिवाजी महाराजांशी पंगा घेऊन पत, पैसा आणि जीव गमवावयला लागला. इंग्रजांची प्रतिष्ठा धुळीला मिळाली.

# सिद्दी जोहरकडून त्याला जास्तीत जास्त धन पदरात पाडून घ्यायचे असावे

- त्या तोफा जहाजावरून लढतीत वापराच्या असल्याने, तोफगोळ्यांची देखभाल वेळोवेळी झालेली नसल्याने, आधी त्याची वापरून प्रात्यक्षिके न झाल्याने, त्यात मिंघ्येम हा मुख्य तोफचीचा मदतनीस असल्याने, अशा विविध कारणांनी तोफांचे प्रात्यक्षिक प्रभावी झाले नसावे. काही गोळे तटबंदीजवळ पडले असतील पण त्यांची मारक क्षमता किरकोळ असावी.
- त्याला त्या तोफा कशा काम करतात यात रस नसावा. कारण तो स्वतः प्रथम पुर्वीच्या मित्राला भेटायला कोल्हापुरात तळ ठोकून राहिलेल्या सरदार रुस्तुम-ए-झमानला भेटला.
- कारण त्यानेच त्याला बोलावले असल्याने त्याला मध्यस्थ करून या मोहिमेचा मुख्य सिद्दी जोहरकडून त्याला जास्तीत जास्त धन पदरात पाडून घ्यायचे असावे.
- पण जायचा यायचा खर्च वगळता जितके अपेक्षित होते तितके धन त्याला मिळाले असेल असे नंतरच्या कफल्लकतेतून दिसत नाही.

# हेनरीचे ११ डिसेंबर १६६१ रोजी निधन झाले

- काळीचे फासे पलटले. तो व अन्य साथिदार राजापुरात पकडले गेले. राजापुरची वखार पुरलेल्या मालासाठी पार खणून काढून नेस्तनाबूत झाली. त्यांना रायरीच्या कैदखान्यात महिनोनमहिने पडावे लागले. सुरतचे कार्यकारी मंडळ घडलेल्या प्रकाराने हानी झाल्यामुळे त्याच्यावर प्रचंड नाराज होते.
- सूरत कार्यकारी मंडळांनी शिवाजीला इंग्रजी कैद्यांच्या सुटकेसाठी काही गळ घालणारी पत्रे लिहिली होती परंतु त्यापैकी कोणत्याही पत्राची दखल घेतली गेली नाही.
- दरम्यान रेव्हिंग्टन आजारी पडला म्हणून पेरोलवर सोडला गेला. शिवाय शल्यविशारद डॉक्टर रॉबर्ट वॉर्ड आणि विल्यम मिंघेम यांच्याबरोबर प्रवास करताना, पेरोलवर परत येण्याचे आश्वासन देऊन ते सटकले. बोटीने प्रवास करत रेव्हिंग्टन आणि इतर दोन १७ ऑक्टोबर १६६१ रोजी सुरत येथे दाखल झाले.
- सुरतला परत आल्यावर शरीराने दुर्बल व आर्थिक दुराचाराने कफल्लक झालेल्या हेनरीचे ११ डिसेंबर १६६१ रोजी निधन झाले

# इंग्रजांच्या लेखी लबाड, भामट्या (Rogue) शिवाजी

- ❖ दुसऱ्या दिवशी सुरत येथे एक सल्लामसलत झाली आणि काही मिनिटांत असे ठरविण्यात आले की हेनरी नोकरी करत असताना निवर्तल्याने त्याच्या वैयक्तिक मालमत्तेची विक्री करून त्याच्या नोकरांच्या कडून व दक्षिणेतील भागात अन्य उचापती करून झालेल्या कर्जाची रक्कम त्याच्या खाजगी मालमत्तेतून, पगारातून वळती करून शक्यतोवर वसूली व्हावी.
- ❖ सूरत परिषदेला उरलेल्या इंग्रजी कैद्यांमधून आणखी तीन पत्र मिळाली. त्यांना रायरीहून दुसरीकडे पाठवण्यात आले. परिषदेने १० मार्च १६६२ रोजी लिहिले की आम्ही महत्वाच्या कामात व्यस्त असल्याने तुमच्यावर अनावश्यक वेळ घालवण्याची गरज नाही.
- ❖ कारण त्या लबाड, भामट्या (rogue) शिवाजीकडून अद्याप एकही उत्तर परत आले नाही. शिवाय तुमच्या सारख्या कैद्यांकडून आलेल्या तिन्ही पत्रातील उद्धट आणि अनादराची भाषा वाचून आम्हाला धक्का बसला आहे...
- ❖ एकंदरीत शिवाजी महाराजांनी उपद्रवी हेनरीला चांगलीच अद्दल घडवली.

# राजापूरची वखार (राजापूरचा किल्ला)



राजापुरची खाडी


राजापुरची गढी

- राजापूर एक प्राचीन व्यापारी बंदर म्हणून प्रसिद्ध होते. या शहराच्या पश्चिमेकडे अर्जुना व गोडी नदीच्या किनाऱ्यावरील संगमावर बांधली गेली आहे राजापूरची वखार म्हणजेच एक छोटा किल्लाच. १६३८मध्ये दक्षिणेतील एक प्रसिद्ध व्यापारपेठ व समुद्रकाठचे महत्वाचे जलव्यापारी केंद्र म्हणून राजापूरची ख्याती होती.
- अणुस्कुरा घाटमार्गे माल राजापुरात येत असे आणि तिथून गलबतातून जैतापूरच्या खाडीतून मुसाकाजी बंदरावरून मुंबई, अरबस्तान, आफ्रिका अशा ठिकाणी पाठवला जात असे. त्यामुळेच इंग्रजांनी ही वखार या ठिकाणी बांधली.

# राजापूरची गंगा



- इतिहास - अचानक एक झरा वाहायला लागतो यामुळे ती नवलाची घटना गंगा अवतरली म्हणून पवित्र मानतात ते स्थान राजापुर.
- डचांनी वेंगुर्ला येथे वखार बांधली त्यामुळे व्यापारावर पकड बसावी यासाठी इंग्रजांनी राजापूर येथे १६४९ रोजी वखार बांधली. पुढे अफजल खानाला शिवाजी महाराजांनी मारल्या नंतर त्याच्या मालकीची तीन गलबते राजापूरचा अधिकारी असलेला अब्दुल करीमच्या ताब्यात गेली. त्याने ती गलबते इंग्रज वखारवाल्यांच्या ताब्यात दिली.
- शिवाजी महाराजांना हे समजताच त्यांनी दोरोजी या आपल्या सरदाराला गलबतांचा ताबा घेण्यास इंग्रजांकडे पाठवले. पण इंग्रजांनी गलबते देण्यास नकार दिला. त्यामुळे महाराजांनी २० जानेवारी १६६० रोजी राजापूरची वखार लुटून वखारीचा प्रमुख हेन्री रेव्हिंग्टन आणि अन्य अधिकाऱ्यांना कैद केले पण दुसऱ्यांच्या भांडणात परत पडणार नाही असा शब्द देऊन त्याने स्वतः सोडवून घेतले. त्याच्या पुढच्या वर्षी शिवाजी महाराज पन्हाळ्याच्या वेढ्यात अडकले असताना सिद्धी जोहरने राजापूरच्या इंग्रजांची मदत मागितली, तेव्हा रेव्हिंग्टन व गिफर्ड हे अधिकारी वेलची नावाच्या दुभाष्यासह २ तोफा व ५० गोळे घेऊन पन्हाळ्याला आले व त्याने सिद्धीला मदत केली. त्यामुळे हा वेढा सुटताच महाराजांनी इंग्रजांवर वचक बसवण्यासाठी १००० घोडेस्वार व ३००० पायदळ घेऊन वखारीवर हल्ला करून अधिकाऱ्यांना कैद केले आणि इथली संपत्ती स्वराज्याच्या खजिन्यात जमा केली.
- या अधिकाऱ्यांना वासोट्यावर कैदेत ठेवले. या कैदेत काही इंग्रज अधिकारी मेले तर रेव्हिंग्टन आजारी पडला शेवटी १७ जून १६६३ ला शिवरायांनी त्यांना सोडून दिले. महाराजांनी वखार लुटल्यामुळे ती बंद पडली पण पुढे १६६८ मध्ये इंग्रजांनी ती पुन्हा चालू केली. यानंतर दोन वर्षांनी १६७० ला शिवाजी महाराजांच्या स्वारीनंतर ही वखार पुन्हा बंद पडली.

# प्रभानवल्लीचा सुर्वे विशाळगडावर आला कसा ?

- ऐतिहासिक काळात सुर्वे- दळवी यांच्या सैन्याचा तळ त्या पार्किंग भागात होता. तो प्रभानवल्लीहून आला होता म्हणून शिवाजी महाराजांच्या सैन्याला भिडायला दरीत उतरून यावे लागले. भाग ६ मधे महाराजांनी ते कसे घडवले ते सादर केले आहे.....
- या किल्ल्याची नैसर्गिक ठेवण अन्य किल्ल्यांपेक्षा वेगळी आहे. एका बाजूला खर्निकोची दरी आहे. गजापुरच्या बाजूने येताना समोर गडावर चढायची वाट दिसत असताना तिथ जायला मात्र सध्याच्या पुलाऐवजी ७०-८० फूट खाली उतरून पुन्हा तितकेच वर आल्यावर मग उजवीकडील वळणदार वाटेने आले की मग मुंढा (मुख्य) दरवाजा लागतो.
- गडाच्या मागील बाजूला मुचकुंदी नदीच्या उगमाने तयार दरीचा भाग आहे. या मागच्या बाजूला बालेकिल्ला आहे. त्या बाजूला माचाळ गावाचा कोकण दरवाजा येतो. त्याला पार करायला अवघड चिंचोळ्या वाटेने जावे लागते.

# कोकणातून विशाळगडाकडे यायचे मार्ग



# शोध विशाळगडावरच्या वास्तूंचा

- दर्ग्याशेजारी एक मशीद आहे आणि त्या मशिदीत एक फारसी शिलालेख. त्यात मलिक रेहान म्हणतो.
- "भोज नावाच्या हिंदू राजाच्या अधीन असलेला हा किल्ला मला सहा वेळा प्रयत्न करूनही मिळाला नाही. शेवटी सातव्यांदा वेढा घातल्यावर किल्ला मजकडे आला"
- इ.स. १४५३ चा सुमारास अलाउद्दीन बहामनीचा सेनापती मलिक उत्तुजार विशाळगडावर प्रचंड सेनेनिशी चालून येत असताना इथल्या गहन अरण्यात शंकर मोरे नावाच्या मराठा सेनापतीने त्याचं सारं सैन्य कापून काढलं.
- १४६९ मध्ये महम्मद गवाननें नऊ महिने किल्ल्याला वेढा घातला तेंव्हा त्याला किल्ला घेता आला...



# पीराच्या महतीचे कारण...

- या संदर्भात आणखी एक वाचनात आले की ह्या पिराच्या महतीचे कारण... (संदर्भ प्रा. अद्वयानंद गळतगे यांच्या डार्विनचा उत्क्रांतीवादी सिद्धांत खरा आहे काय? या आगामी पुस्तकातील एका प्रकरणात ते आपला अनुभव सांगताना लिहितात)
- सन १९५२ मध्ये एका घरगुती भांडणात चोरीचा आळ घरातील सासरेबुवांनी आपल्या दोन सुनांवर घेतला. त्यांनी आम्ही चोरी केली नाही म्हटल्यावर इरेला पडलेल्या सासऱ्यांनी विशाळगडावर जाऊन पिरासमोर खरे खोटे करायचे ठरले. त्याप्रमाणे ते विशाळगडाच्या माथ्यावर पोहोचले. तिथे त्या काळात असे होत असे की हातात बेड्या घालायच्या व जो निर्दोष असेल त्याच्या बेड्या आपोआप सुटतात. ज्याच्या बेड्या निघत नाहीत त्यावर असे काही जे बोलले असेल तो खोटा व दोषी ठरतो.
- त्याप्रमाणे दोन्ही सुनांच्या बेड्या गळून पडल्या पण मग सासऱ्यांनी पण ही परीक्षा द्यावी असा आग्रह झाला. तेव्हा त्या सासऱ्यांच्या हातातील बेड्या सुटल्या नाहीत... पुढे त्या सासऱ्यांना वाईट दशा आली... वगैरे वगैरे....
- ती ती चालरीत पुढे सुरु आहे किंवा नाही याचा शोध विशाळगडावर जाणाऱ्यांनी जरूर घेवून त्यांचा अनुभव सादर करावा ही विनंती...( प्रा. गळतगे यांच्या नुकत्याच विशाळगडीवरील भेटीत ही प्रथा बंद पडलेली आहे असे त्यांना जाणवले.)

# कर्नाटकातून भाविक बसेस भरून येतात

- काही काळापूर्वी तिथे जाणाऱ्यांशी बोलण्याचा प्रयत्न केला होता. सुरवातीला व्हिडिओ चित्रीकरण म्हटल्यावर जरा काचकूच केली पण नंतर आम्ही मराठीत बोलताना पाहून काही स्त्रियांनी मराठीत संभाषण केले. त्या मिरज भागातील होत्या. त्यांच्याशी बोलताना पाहून इतरही बोलू लागले.
- साधारणपणे हे भाविक कर्नाटकातून बसेस भरून येतात. मन्नत पूरी झाल्यावर ऐपतीप्रमाणे बकरा, मुर्गी आम्ही कुर्बानी करतो. ते घरून आणलेले परवडते. इथे विक्रीसाठी फार महाग देतात. वगैरे बोलणे झाले.
- मला बेडीच्या बद्दल माहिती तेंव्हा नव्हती. पण तिथे विशिष्ठ दिवशी दरवाजा उघडला जातो वगैरे बोलताना चित्रफितीतून कळते. दर्ग्याच्या संपन्नतेची ओळख पाहून समजते.



# छत्रपती शिवाजी महाराज आणि त्यांच्या शूर मावळ्यांना सादर समर्पण...

